**म्हाडाच्या गोरेगाव सिध्दार्थ नगर सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या पुनर्विकासाच्या अनुषंगाने म्हाडाने जारी केलेल्या दि.२६.०७.२०११ चे ना-हरकत प्रमाणपत्र तसेच दि.०९.११.२०११ च्या संयुक्त करार पत्रान्वये केलेल्या सुधारणा संदर्भात चौकशी करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : वाटप- २०१८/प्र.क्र.१४३ (भाग-१)/गृनिप**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २९ नोव्हेंबर, २०१८

वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक : वाटप- २०१८/प्र.क्र.१४३/गृनिप, दि. २८.०३.२०१८
२) शासन निर्णय क्रमांक : वाटप- २०१८/प्र.क्र.१४३/गृनिप, दि.१२.०६.२०१८
३) शासन निर्णय क्रमांक : वाटप- २०१८/प्र.क्र.१४३/गृनिप, दि. ०६.०८.२०१८

**प्रस्तावना-**

मुंबईतील गोरेगाव मधील पत्राचाळ येथील गोरेगाव सिध्दार्थ नगर सह. गृह. संस्था मर्यादीतच्या पुनर्विकास प्रक्रियेमध्ये म्हाडाने दि.२६.०७.२०११ रोजी जारी केलेले ना-हरकत प्रमाणपत्र व तद्नंतर या पुनर्विकासासंदर्भातील दि.१०.०४.२००८ रोजीच्या त्रिपक्षीय करार नाम्यामध्ये दि.०९.११.२०११ च्या करारनाम्यान्वये मुळ करारनाम्यामध्ये केलेल्या सुधारणा व या संदर्भात श्री. कामदार, ज्येष्ठ विधिज्ञ यांनी दि.०८.०३.२०१८ रोजी म्हाडास दिलेले अभिप्राय विचारात घेऊन या प्रकरणी सखोल चौकशी करुन एका महिन्यात शासनास अहवाल सादर करण्याकरीता श्री. जॉनी जोसेफ, निवृत्त मुख्य सचिव यांची नियुक्ती संदर्भ क्र. १ येथील दि.२८.०३.२०१८ रोजीच्य शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे. तथापि, विहित कालावधीत अहवाल सादर न झाल्यामुळे संदर्भ क्र. २ व ३ येथील शासन निर्णयामुळे या प्रकरणी अहवाल सादर करण्यास दि.३०.०६.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

आता, श्री. जॉनी जोसेफ, निवृत्त मुख्य सचिव यांनी दि.२७.०९.२०१८ रोजी सदर अहवाल शासनास सादर केलेला असल्याने दि.०१.०७.२०१८ ते दि. २७.०९.२०१८ या वाढीव कालावधीच्या मुदतवाढीस कार्योत्तर मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

शासनाच्या संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये नियुक्त केलेल्या श्री. जॉनी जोसेफ, निवृत्त मुख्य सचिव यांच्या एक सदस्यीय समितीने त्यांचा अहवाल दि.२७.०९.२०१८ रोजी शासनास सादर केला असल्याने सदर समितीस अहवाल सादर करण्यास दि.०१.०७.२०१८ ते दि.२७.०९.२०१८ पर्यंत लागलेल्या वाढीव कालावधीच्या मुदतवाढीस कार्योत्तर मान्यता देण्यात येत आहे.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८११२९१३०७१४१४०९ असा आहे. प्रस्तुत शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manohar
Ramchandra Parkar

Digitally signed by Manohar Ramchandra Parkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c4c0810e9c94cf92d42a36d93c8f7b6ac18542c1ee758c9cfddcea906d9cf544, serialNumber=fb43688343316856c0f7e793462127aa87fce45724e87929c6889798cd7d2c62, cn=Manohar Ramchandra Parkar
Date: 2018.11.29 14:58:08 +05'30'

**( म. रा. पारकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई-३५.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/ विधानपरिषद, विधानभवन, मुंबई-३२.
४) मा. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य.
५) मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.
६) मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.
७) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई-३२.
८) महालेखापाल, महाराष्ट्र - १, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा).
९) महालेखापाल, महाराष्ट्र - २, नागपूर (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा).
१०) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
११) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई-५१.
१२) मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, मुंबई-५१.
१३) गृहनिर्माण विभागातील उप सचिव
१४) निवड नस्ती - गृनिप.